**डॉ. ए. पी. जे. अब्दुल कलाम यांचा दि.१५ ऑक्टोबर हा जन्मदिन, “ वाचन प्रेरणा दिवस ” म्हणून साजरा करण्याबाबत .**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः बैठक -२४१३/(प्र.क्र.१४०/१५)/समन्वय**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.

तारीख: ०९ ऑक्टोबर, २०१५.

**शासन परिपत्रक -**

डॉ. ए. पी. जे. अब्दुल कलाम यांच्या स्मृती जतन करण्याच्या अनुषंगाने त्यांचा दि.१५ ऑक्टोबर हा जन्मदिन, “ वाचन प्रेरणा दिवस ” म्हणून साजरा करण्यात येणार आहे. विद्यार्थ्यांमध्ये व समाजाच्या इतर घटकांना वाचनाची आवड व प्रेरणा निर्माण होणे व वाचनाचे महत्व जाणून घेण्यासाठी दि.१५ ऑक्टोबर, २०१५ हा “ वाचन प्रेरणा दिवस ” म्हणून साजरा करण्यात यावा याकरीता या विभागाच्या अधिपत्याखालील अकृषी विद्यापीठांनी खालील उपक्रमांचे आयोजन करावे.

१ उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील १४ अकृषी विद्यापीठांमध्ये डॉ. ए. पी. जे. अब्दुल कलाम यांच्या १) The Wings of Fire, २) Ignited Mind, ३) Indomitable India ४) India २०२० या व इतर पुस्तकांच्या वाचनाच्या अनुषंगाने चर्चासत्रे, वकृत्व स्पर्धा, परिसंवाद इत्यादि कार्यक्रम आयोजित करावेत.

२ विद्यापीठांकडून काही निवडक महाविद्यालयांची निवड करुन त्यांना वाचन प्रेरणा दिवसाच्या अनुषंगाने स्वतंत्रपणे कार्यक्रम आयोजित करण्यासाठी सूचना देण्यात याव्यात.

२. तसेच वाचन प्रेरणा वृद्धींगत होण्यासाठी या विभागाच्या अधिपत्याखालील महाविद्यालयांनी खालील उपक्रमांचे आयोजन करावे.

१ महाविद्यालयीन शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांनी किमान किती पुस्तके, किती कालावधीत वाचावीत याबाबतचा कृती आराखडा महाविद्यालयांनी ठरवावा व त्यानुसार वाचन उपक्रम राबवावा.

२ महाविद्यालयांनी स्वतंत्ररित्या वाचन /प्रबोधन कार्यक्रम आयोजित करावे.

३ महाविद्यालयांमध्ये आयोजित करण्यात आलेल्या कार्यक्रमांमध्ये विद्यार्थ्यांचा अधिकाधिक उत्स्फूर्त सहभाग असेल अशा पद्धतीने कार्यक्रमाची आखणी करण्यात यावी.

३. त्याचप्रमाणे समाजाच्या इतर घटकांना वाचनाची आवड व प्रेरणा निर्माण होण्यासाठी ग्रंथालयांचा सहभाग असावा म्हणून संचालक ( ग्रंथालय ) यांनी खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.

१ सार्वजनिक ग्रंथालये लोकांच्या मदतीने बळकट करण्यात यावीत. यासंदर्भात वर्षनिहाय उद्दिष्ट ठरविण्यात यावीत.

२ ग्रंथालयातील वाचन संस्कृती वाढीसाठी संचालक ( ग्रंथालय ) यांनी या दिवशी विशेष कार्यक्रम आयोजित करावेत.

३ या दिवशी राज्यातील सर्व ( सुमारे १२००० ) शासकीय ग्रंथालयांमध्ये खुले ग्रंथ प्रदर्शन आयोजित करण्यात यावे.

४. वाचन प्रेरणा दिवस यशस्वी होण्याकरीता प्रत्येक व्यक्तीचे योगदान महत्वाचे आहे. यासाठी विविध उपक्रमांचे आयोजन करण्यात यावे.

१ WhatsApp, Internet, Facebook, Twitter या माध्यमातून वाचन प्रेरणा मिळेल अशा सूचना प्रसारित करण्यात याव्यात.

२ विविध क्षेत्रातील सुप्रसिद्ध व्यक्ती ( सेलिब्रिटीज ) ज्यांचा वाचक म्हणूनही लौकिक आहे, त्यांचे सहकार्य घेऊन, आयोजित कार्यक्रम यशस्वी करण्यात यावेत.

३ व्याख्यान, भाषण, चर्चासत्र, सामूहिक वाचन, अभिवाचन, वाचन अनुभव कथन, ग्रंथ प्रदर्शन, विविध स्पर्धा इत्यादींपैकी सुयोग्य उपक्रम राबविण्यात यावेत.

४ विद्यार्थी, शिक्षक, सर्व सामान्य वाचक याव्यतिरिक्त मित्र, कुटुंबातील सदस्य यांनी एकमेंकाना किमान एक पुस्तक भेट म्हणून द्यावे.

५ महाविद्यालयातील ग्रंथालयांना प्रत्येकाने किमान एक वाचनीय /प्रसिद्ध पुस्तक भेट द्यावे.

५. वाचन प्रेरणा दिवसाच्या निमित्ताने डॉ. ए. पी. जे. अब्दुल कलाम यांचे लेखन व विचार महत्वाचे आहेतच त्याचबरोबर एकूण वाचन संस्कृती व वाचन प्रेरणा वाढीस लागणे याकरीता दि.१५ ऑक्टोबर हा दिवस “ वाचन प्रेरणा दिवस ” म्हणून नियोजनबद्धरितीने साजरा करण्यात यावा.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१५१००९१६२६१७९४०८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kamini R Pilankar

Digitally signed by Kamini R Pilankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=791d70f75a8bfaa8349786f02d71cad4fb9d1999ea0d92d63dcf5de198d4f817, cn=Kamini R Pilankar
Date: 2015.10.09 16:28:40 +05'30'

**( का.रा.पिळणकर )**
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री ( उच्च व तंत्र शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री ( उच्च व तंत्र शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
७. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०.संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११.कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे.
१२.निवडनस्ती.